**घाटकोपर, मुंबई येथील बेकायदेशीर फलक कोसळून झालेल्या घटनेची उच्चस्तरीय चौकशी करण्यासाठी नेमलेल्या चौकशी समितीची कार्यकक्षा निश्चित करणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः H.D.-32011/4/2024-O/o JT.SECY6-MHD(PG)-Home Department**

गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २९ जुलै, २०२४

वाचा :-

**शासन निर्णय, गृह विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई क्रमांकः** कल्याण-०५२४/प्र.क्र.१३१/पोल-७, दिनांक १० जून, २०२४

प्रस्तावना :-

घाटकोपर, मुंबई येथील लोहमार्ग पोलीसांच्या जमिनीवर असलेले बेकायदेशीर फलक दिनांक १३ मे, २०२४ रोजी नजिकच्या पेट्रोल पंपावर कोसळल्याने १६ निरपराध व्यक्तींचा दुर्दैवी मृत्यू झाला. या घटनेमुळे शहरातील जाहिरात फलक, विशेषतः शासकीय, पोलीस किंवा रेल्वे मालमत्तांवरील जाहिरात फलक यांची सुरक्षितता आणि कायदेशीरता याबाबत अनेक प्रश्न उपस्थित झाल्याने घाटकोपर, मुंबई येथील जाहिरात फलक दुर्घटनेची समयबद्ध चौकशी करण्यासाठी "श्री. दिलीप भोसले, माजी मुख्य न्यायाधीश, मा. उच्च न्यायालय, मुंबई" यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १० जून, २०२४ च्या शासन निर्णयान्वये चौकशी समिती गठीत करण्यात आली आहे.

घाटकोपर, मुंबई येथील पेट्रोल पंप आवारातील जाहिरात फलक पेट्रोल पंपावर कोसळणे, या प्रकरणी घटनेस जबाबदार असलेल्या बाबींची चौकशी करणे आणि भविष्यात अशा प्रकारच्या घटनांची पुनरावृत्ती टाळणे या बाबींसाठी शिफारशी करण्याकरिता गठीत केलेल्या समितीची रचना व कार्यकक्षा निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

दिनांक १३ मे, २०२४ रोजी घाटकोपर, मुंबई येथे लोहमार्ग पोलीस यंत्रणेच्या जमिनीवरील बेकायदेशीर जाहिरात फलक कोसळल्याने झालेल्या दुर्घटनेची चौकशी करण्यासाठी माजी न्यायमुर्ती

श्री. दिलीप भोसले यांच्या अध्यक्षतेखाली नेमलेल्या चौकशी समिती मध्ये खालील सदस्यांचा समावेश करण्यात येत आहे:-

**चौकशी समितीची रचना**

| अ.क्र. | नाव/ पदनाम | कार्यालय | समितीमधील पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. दिलीप भोसले | मा. उच्च न्यायालयाचे माजी मुख्य न्यायमुर्ती | अध्यक्ष |
| २ | अतिरिक्त आयुक्त | बृहन्मुंबई महानगरपालिका | सदस्य |
| ३ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयातील अपर पोलीस महासंचालक (ADG) श्रेणीपेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ४ | आय.आय.टी., मुंबई मधील बाह्य संरचनेच्या सुरक्षेचे मुल्यांकन करण्याचा अनुभव असलेले स्ट्रक्चरल अभियंता | आय.आय.टी., मुंबई | सदस्य |
| ५ | आर्थिक अनियमितता आणि कर चुकवेगिरीचा तपास करण्याचा अनुभव असलेला आयकर अधिकारी किंवा आयकर आयुक्त | आयकर विभाग | सदस्य |
| ६ | व्यावसायिक, आर्थिक तपास आणि लेखापरिक्षणात निपुन असलेले एक चार्टर्ड अकाऊंटंट (CA) | -- | सदस्य |

**चौकशी समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-**

(१) सदर समिती घटना, तिची कारणे आणि परिणामांचा क्रम तपासेल
(The Committee shall examine the sequence of events/ causes and consequences)

(२) जाहिरात फलक आणि पेट्रोलपंपासाठी जबाबदार असलेल्या कंपनीच्या सहभागाची तपासणी करणे,कंपनीचा पूर्व इतिहास, आर्थिक व्यवहाराचा माग आणि विविध कार्यालये/ अभिकरणांतील अधिकाऱ्यांशी संगणमत केल्याचा कोणताही पुरावा याची तपासणी करणे.

(Assess the role of the company(s) responsible for the hoarding and the petrol pump, including their previous records, financial trails, and any evidence of collusion with officials of various agencies.)

(३) पोलीसांच्या कल्याणकारी हेतूंसाठी, रेल्वे किंवा पोलीसांच्या जागा/ मालमत्तेवर जाहिरात फलक मंजूर करण्याची आवश्यकता तपासणे अन्यथा प्रक्रियेचे पुनरावलोकन करणे.

(Review the adequacy or otherwise of the process for approval/ installing hoarding at railway or police properties for welfare purpose.)

(४) भविष्यात अशा घटना टाळण्यासाठी पोलीस विभागाच्या/ रेल्वे पोलीसांच्या जमिनीवरील जाहिरात फलक उभारण्याविषयीच्या धोरणाबाबत शिफारस करणे.

(Recommend review hoarding policy of all railway/ police land to avoid such incidents in future.)

(५) राज्यातील पोलीस दलाकडील/ रेल्वे पोलीस यांच्याकडील जमिनीवर असणाऱ्या जाहिरात फलक व पेट्रोल पंप यासंदर्भातील धोरणाचे पुनर्विलोकन करणे आणि शिफारशी करणे.

(Review and provide suggestions for improving the policy for Hoarding and petrol pump on all railway/ police land.)

(६) जाहिरात फलक आणि पेट्रोल पंप दोन्हींची सुरक्षितता सुनिश्चित करण्यासाठी आणि बेकायदेशीर बाबी रोखणे यासाठी यासंदर्भातील धोरण आणि कार्यपध्दतीत सुधारणा करण्याबाबत शिफारस करणे.

(Recommend changes to policies and procedures to ensure the safety of both hoarding and petrol pumps and prevent illegal installations or operations.)

(७) समितीने जमिनीच्या वापरातील बदलासह जमिनीची स्थिती आणि पेट्रोल पंप वाटपाची प्रक्रिया, होर्डिंगचे अधिकार, आर्थिक अटी व शर्थींचा तपशील इ. बाबींची तपासणी करणे.

(The Committee to go into the details of status of land including the change of land and also how the process of allotment of petrol pump, hoardings rights etc. including the financial terms etc.)

सदर चौकशी समिती आपला चौकशी अहवाल आपल्या स्वयंस्पष्ट अभिप्रायांसह एक महिन्याच्या कालावधीत शासनास सादर करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२९१५०३३८४४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHETAN BALASAHEB NIKAM

Digitally signed by CHETAN BALASAHEB NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7268DE40660971F80951C66D0E657E903B378196F51A978D2A366CF5EB564C0C, cn=CHETAN BALASAHEB NIKAM
Date: 2024.07.29 15:49:26 +05'30'

**(चेतन निकम)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, गृह, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
११.आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका.
१२.महासंचालक, लोहमार्ग पोलीस, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३.निवडनस्ती, कार्यासन पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.